नगरपरिषद मुख्याधिकारी गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एमसीओ २०१४/प्र.क्र. २२६/नवि १४**
**शिबीर कार्यालय,**
**हैद्राबाद हाऊस,नागपूर- ४४०००१**
**दिनांक : १२ डिसेंबर, २०१४**

**वाचा :-** -शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. एमसीओ २०१३/प्र.क्र. ६३/१३/नवि १४, दिनांक ०४.०३.२०१४

**शासन आदेश :-**

उपरोक्त दिनांक ०४.०३.२०१४ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत शिफारस प्राप्त मुख्याधिकारी गट-अ संवर्गातील मुख्याधिकाऱ्यांना नियमित पदस्थापना देण्याच्या दृष्टीने तसेच, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार काही कार्यरत गट-अ संवर्गातील मुख्याधिकाऱ्यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदल्या करण्यात येत असुन त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | पदस्थापनेचे पद | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. योगेश कडुसकर | उपायुक्त, पुणे महानगरपालिका | परिविक्षाधीन मुख्याधिकारी यांना नियमित पदस्थापना- रिक्त पदावर |
| २ | श्री. विपीन मुद्धा | मुख्याधिकारी कामठी नगरपरिषद, जि. नागपूर | परिविक्षाधीन मुख्याधिकारी यांना नियमित पदस्थापना- रिक्त पदावर |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | पदस्थापनेचे पद | शेरा |
|---|---|---|---|
| ३ | श्री. अनिकेत मानोरकर | जिल्हा प्रशासन अधिकारी, जळगाव | परिविक्षाधीन मुख्याधिकारी यांना नियमित पदस्थापना-रिक्त पदावर |
| ४ | श्री. जमीर लेंगरेकर | उपायुक्त, उल्हासनगर महानगरपालिका | परिविक्षाधीन मुख्याधिकारी यांना नियमित पदस्थापना म्हणुन श्री. डी. जी. पवार, उपायुक्त, उल्हासनगर मनपा यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर |
| ५ | श्री. नितीन कापडणीस | जिल्हा प्रशासन अधिकारी, अहमदनगर | परिविक्षाधीन मुख्याधिकारी यांना नियमित पदस्थापना-रिक्त पदावर |
| ६ | डॉ. बाबुराव देवराव बिक्कड | मुख्याधिकारी परळी वैजनाथ नगरपरिषद, जि. बीड | परिविक्षाधीन मुख्याधिकारी यांना नियमित पदस्थापना-रिक्त पदावर |
| ७ | श्री. रोहीदास दोरकुळकर | मुख्याधिकारी श्रीरामपूर नगरपरिषद, जि. अहमदनगर | परिविक्षाधीन मुख्याधिकारी यांना नियमित मुख्याधिकारी म्हणुन श्री. संतोष खांडेकर, मुख्याधिकारी श्रीरामपूर नप यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर |
| ८ | श्री. चंदन पाटील | उपायुक्त, अमरावती महानगरपालिका | परिविक्षाधीन मुख्याधिकारी यांना नियमित पदस्थापना-रिक्त पदावर |
| ९ | श्री. डी. जी. पवार उपायुक्त, उल्हासनगर मनपा | मुख्याधिकारी, कुळगाव बदलापुर नगरपरिषद, जि. ठाणे | प्रशासकीय कारणास्तव रिक्त पदावर |
| १० | श्री. संतोष खांडेकर मुख्याधिकारी श्रीरामपूर नगरपरिषद, जि. अहमदनगर | उपायुक्त, नाशिक महानगरपालिका, जि. नाशिक | प्रशासकीय कारणास्तव रिक्त पदावर |

०२. सर्व संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी पर्यायी अधिकारी रुजू होण्याची प्रतिक्षा न करता त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेल्या व बदली झालेल्या अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच सर्व संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्ह्यातील मुख्याधिकाऱ्यांच्या बदलीमुळे रिक्त रहाणाऱ्या नगरपरिषदांच्या मुख्याधिकारी पदाचा अतिरीक्त कार्यभार जवळपासच्या नगरपरिषद मुख्याधिकाऱ्याकडे किंवा महसुल अधिकाऱ्यांकडे सुपुर्द करुन संबंधित मुख्याधिकाऱ्यास कार्यमुक्त करावे.

०३. तसेच या आदेशान्वये करण्यात आलेल्या बदल्या रद्द करणे किंवा त्यात बदल करणे या साठी राजकीय दडपण/ दबाव आणल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित मुख्याधिकाऱ्यांविरुद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ अनुसार शिस्तभंगाची कारवाई सुरू करण्यात येईल.

०४. सर्व संबंधित मुख्याधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या नवीन ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

०५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१०१७०९४९६७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=UDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2014.12.12 10:26:39 +05'30'

**(मिलिंद कुळकर्णी)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
२. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक
३. सर्व जिल्हाधिकारी
४. सर्व संबंधित आयुक्त, महानगरपालिका
५. सर्व संबंधित अध्यक्ष, नगरपरिषद
६. सर्व संबंधित मुख्याधिकारी गट-अ

**प्रतिलिपि,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४. नगर विकास विभाग/ का.क्र.नवि १८ मंत्रालय, मुंबई
५. निवड नस्ती/नवि १४